**माळढोक पक्षी अभयारण्य, नागझिरा अभयारण्य व ताडोबा राष्ट्रीय उद्यानाची स्थापना या योजनेत्तर योजने खाली निर्माण करण्यात आलेल्या १ अस्थायी पद सन २०१५-१६ मध्ये पुढे चालू ठेवण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : डब्ल्यूएलपी ०१.१५/प्र.क्र.११/फ-१**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :-०५ फेब्रुवारी, २०१५.

<u>वाचा :-</u>

१. शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक डब्ल्यूएलपी ०३.१४/प्र.क्र.८२/फ-१, दिनांक :- १३.०३.२०१४.
२. शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक एफएसटी-१०.०४/प्र.क्र.१०९/फ-४, दिनांक :- ०८.०८.२००६.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष ३/ योजनेतर /प्र.क्र.६/१४-१५/१२०७, दिनांक :- २१.१०.२०१४.

**शासन निर्णय :-**

माळढोक पक्षी अभयारण्य, नागझिरा अभयारण्य व ताडोबा राष्ट्रीय उद्यानाची स्थापना या योजनेत्तर योजने खाली निर्माण करण्यात आलेल्या सहाय्यक वनसंरक्षक या संवर्गातील १ अस्थायी पदास अनुक्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये सन २०१४-१५ या अर्थिक वर्षात दिनांक ०१.०३.२०१४ ते दिनांक २८.०२.२०१५ पर्यंत चालू ठेवण्यासाठी शासनाची मंजुरी प्रदान करण्यात आली आहे. आता सहाय्यक वनसंरक्षक या संवर्गातील १ अस्थायी पद पुढे चालू ठेवण्याबाबत अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी प्रस्तावित केल्याप्रमाणे उपरोक्त सहाय्यक वनसंरक्षक या संवर्गातील १ अस्थायी पदास सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात दिनांक ०१.०३.२०१५ ते दिनांक २९.०२.२०१६ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर सहाय्यक वनसंरक्षक या संवर्गातील १ अस्थायी पदाच्या आस्थापनेवर होणारा खर्च २४०६ वनीकरण व वन्य जीवन (योजनेतर), ०२ पर्यावरणीय वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवन संरक्षण, (००) (००) (०१) निसर्ग संवर्धन व वन्य पशु संरक्षण (२४०६ ०७६६) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २०१५-१६ या वर्षासाठी उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय, क्र.असंक-१००४/प्र.क्र.१२/(भाग-२) /२००४/वित्तीय सुधारणा-१, दि.४.१०.२००४ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२०५१७०२४५६०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

APTE ARVIND SHANKAR

Digitally signed by APTE ARVIND SHANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT,CID - 918010, postalCode=400032, st=Maharashtra, cn=APTE ARVIND SHANKAR
Date: 2015.02.05 17:10:59 +05'30'

**( अरविंद आपटे )**
विशेष कार्य अधिकारी,
महसूल व वन विभाग.

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर,
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर,
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर,
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पूर्व, नागपूर
५. वनसंरक्षक (वन्यजीव), गोंदिया.
६. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा), म.रा.मुंबई/नागपूर,
७. वित्त विभाग (व्यय-१०), मंत्रालय, मुंबई - ३२,
८. ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२,
९. फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२ (निवडनस्ती).